गोपनीय
तात्काळ

महाराष्ट्र राज्य कर्मचारी समन्वय महासंघ, नागपूर यांनी दिनांक २८, २९ व ३० मार्च १९८८ रोजी लाक्षणिक संप करण्याची दिलेली सूचना.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक :एसटीके-१०८८/सीआर-२०/१६-अ,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.
दिनांक : २६ मार्च, १९८८.

## परिपत्रक

महाराष्ट्र राज्य कर्मचारी समन्वय महासंघ, नागपूर यांनी दिनांक २८, २९ व ३० मार्च १९८८ रोजी लाक्षणिक संप करण्याबाबत निर्णय समन्वय महासंघाच्या सभेत घेण्यात आल्याची सूचना शासनास दिली आहे. त्यासंबंधात करावयाच्या कार्यवाहीच्या सूचना समक्रमांक व दिनांकाच्या परिपत्रकात देण्यात आल्या आहेत. त्या संपामध्ये मंत्रालयातील काही तृतीय व चतुर्थश्रेणी कर्मचारी भाग घेण्याची शक्यता आहे. ह्या संपामुळे उद्भवणारी परिस्थिती हाताळण्याच्या दृष्टीने मंत्रालयीन विभागांनी संपकाळात पुढीलप्रमाणे व्यवस्था करावी.

[१] विविध विभागातील खोल्यांच्या चाव्या मंत्रालयाचे सुरक्षा अधिकारी किंवा सुरक्षा कर्मचारी किंवा ज्या गृह रक्षकांना चाव्या जमा करण्याच्या नेहमीच्या ठिकाणी नेमण्यात येईल त्यांचे स्वाधीन रहातील. यास्तव प्रत्येक सचिवांनी त्यांच्या विभागातील खोल्यांच्या चाव्या घेऊन खोल्या उघडल्या जातील तसेच कार्यालयीन वेळेनंतर खोल्या बंद करुन संबंधित सुरक्षा कर्मचारी किंवा होमगार्ड यांच्या स्वाधीन केल्या जातील अशी व्यवस्था करावी.

[२] विभागातील नोंदणी कक्षाचे काम ज्यात प्रामुख्याने शासनाकडे येणारे टपाल, तार डाक इत्यादी स्वीकारणे व ज्यावर तातडीच्या कार्यवाहीची आवश्यकता आहे त्यांची नोंद घेऊन संबंधित अधिकाऱ्याकडे पाठविणे तसेच निर्गमित करावयाची जी पत्रे दुसऱ्या दिवसापर्यंत प्रलंबित ठेवता येण्यासारखी नाहीत ती निर्गमित करणे ह्याचा समावेश आहे ते पार पाडण्यात यावे, म्हणून योग्य ती व्यवस्था प्रत्येक सचिवाने करावी.

२. विभागात वरीलप्रमाणे व्यवस्था करण्यात आली आहे याची खातरजमा करुन घेऊन त्याचा अहवाल सामान्य प्रशासन विभागाकडे तात्काळ पाठवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

मु. रामकृष्ण